**महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिद्धी या योजनेकरिता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- अविवि-२०२४/प्र.क्र.१६८ /का-९**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ३१ मार्च, २०२५.

वाचा :-

१) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र. अविवि २००९/ प्र.क्र.४२/ ०९/का.१, दिनांक ५.२.२००९.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३ ,दि.२५.०७.२०२४.

३) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि २०२४/ प्र.क्र.१३७/का.९, दि.६.२.२०२५.

**प्रस्तावना :-**

अल्पसंख्याक विकास विभागामार्फत अल्पसंख्याक समाजाच्या आर्थिक, सामाजिक व शैक्षणिक विकासाच्या विविध योजना राबविण्यात येतात. या योजनांची प्रभावी अंमलबजावणी व्हावी, याकरिता तसेच लाभार्थ्यांच्या संख्येमध्ये मोठ्या प्रमाणात वाढ व्हावी, या उद्देशाने योजनांना व्यापक प्रसिद्धी देणे, अल्पसंख्याकांच्या समस्यांबाबत संशोधन करणे व अल्पसंख्याकांशी संबंधीत योजनांची अंमलबजावणी करणारे अधिकारी / कर्मचारी यांना प्रशिक्षण देणे याकरिता शासनामार्फत संशोधन, प्रशिक्षण व प्रसिद्धी ही योजना राबविण्यात येते. या योजनेंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात राज्यातील अल्पसंख्याक समुहाकरिता विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या शैक्षणिक, आर्थिक व सामाजिक योजनांना विविध समाजमाध्यमांद्वारे व्यापक प्रसिद्धी देण्याचा कार्यक्रम राबविण्यात आलेला आहे. याकरिता संबंधीत संस्थांनी सदर प्रसिद्धी कार्यक्रमाचे देयक सादर केलेले आहे. तसेच विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांच्या अनुषंगाने प्रसिद्ध करण्यात आलेल्या जाहीरातींची देयके अदा करणे तसेच यानुषंगिक बाबींकरिता या योजनेंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी उपलब्ध तरतुदीमधून महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी “मागणी क्रमांक झेडई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य, (०१) (१२) संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिद्धी यासाठी सहायक अनुदान

(कार्यक्रम) (२२३५ ए १८७) ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षा अंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता सुधारित अंदाजानुसार एकूण रु.८.४० कोटी (अक्षरी रुपये आठ कोटी चाळीस लक्ष फक्त) इतका निधी मंजूर आहे.

२. त्यानुसार, वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर उपलब्ध करून दिलेल्या रु.८.४० कोटी निधीपैकी शासन निर्णय दिनांक ६.२.२०२५ अन्वये रु.६.०० कोटी इतके अनुदान महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वितरित करण्यात आलेले आहे. सद्यस्थितीत सदर योजनेंतर्गत रु.२.४० कोटी इतका निधी बीम्स प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध आहे.

३. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या शैक्षणिक, आर्थिक, सामाजिक योजनांना विविध समाजमाध्यमाद्वारे व्यापक प्रसिद्धी देण्यात आलेली आहे. या प्रसिद्धी कार्यक्रमाची देयके अदा करण्याकरिता तसेच विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांच्या अनुषंगाने प्रसिद्ध करण्यात आलेल्या जाहीरातींची देयके अदा करण्याकरिता मागणी क्र.झेड ई ०१, २२३५ ए १८७, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षातर्गत बिम्स प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून **रु.२,०१,९७,१६६/- (अक्षरी रुपये- दोन कोटी एक लक्ष सत्याण्णव हजार एकशे सहासष्ट फक्त**) इतके अनुदान संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिद्धी वरील खर्चाकरिता महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वितरित करण्यात येत आहे.

४. सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरीता, अवर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०२४-२५ च्या मासिक निधी विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे आयोगाच्या कार्यालयाचा खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घेण्यात यावी. या लेखाशिर्षांतर्गत वितरीत करण्यात आलेला निधी त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात यावा. या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certificate शासनांस सादर करावे. तसेच संदर्भ क्र. (२) मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विहीत अटी व तरतुदींचे काटेकोरपणे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी करावे. सदर वितरित निधी बाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्याशिवाय पुढील अनुदान वितरित केले जाणार नाही.

५. उपरोक्त निधी "मागणी क्रमांक झेडई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य, (०१) (१२) संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिद्धी यासाठी सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५ ए १८७) ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग -२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-

२०२४/ प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.७.२०२४ मधील अटींची तसेच सोबतच्या परिशिष्टामधील सर्व बाबींची पुर्तता करण्याच्या अटीस अनुसरुन तसेच **वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.सं.क्र.१३५/२०२५/व्यय १, दि.२८.३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस** अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे."

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३३११८२३२१६११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRASHANT
DADASAHEB
ANDHARE

Digitally signed by PRASHANT DADASAHEB ANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=07a98306254b29e5139aab4819df96eb16b0b66a000c20ad72f67a4639fd58ca, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=7B06EE8A2C581E72F4DCE6564DC954B5C81A4E8EA299DAB1B3C26C0374583EB0, cn=PRASHANT DADASAHEB ANDHARE
Date: 2025.03.31 18:24:39 +05'30'

(प्र. दा. अंधारे)
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई
२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५. अवर सचिव, ( व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
६. कक्ष अधिकारी, (का-७) , अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
७. निवडनस्ती (कार्यासन-९).